महाराष्ट्रातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खादयोपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमएजे-०१९८/२(१०१)/पीआरएस-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २१ ऑक्टोबर, २०००.

**वाचा:-** १) गृह विभाग,शासन निर्णय क्र.डीएफपी-०६७७/९(११५)/पीआरएस-२, दिनांक ७.१०.१९७८.
२) गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-११८८/१(१५५)/पीआरएस-२, दिनांक १३.२.१९८९.
३) गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-०१९८/२(१०१)/पीआरएस-२, दिनांक ११.१.१९९९.
४) गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-०१९८/२(१०१)/पीआरएस-२, दिनांक २७.१.१९९९.
५) गृह विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र.एमएजे-०१९८/२(१०१)/पीआरएस-२, दिनांक ५.४.१९९९.
६) भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित,मुंबई दिनांक ११ सप्टेंबर २००० चे निवेदन पत्र.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंचा पुरवठा करण्याबाबत शासनाने गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-०१९८/२(१०१)/पीआरएस-२ दिनांक ११ जानेवारी १९९९ अन्वये महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादित,मुंबई या शासन अंगीकृत व्यवसाय असलेल्या संस्थेस देण्याबाबतचा निर्णय घेतला होता. त्याचबरोबर अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी मालाचा पुरवठा योग्य दर्जाचा व वेळच्या वेळी करण्याबाबत शासनाने महिला आर्थिक विकास महामंडळ,मर्यादीत, मुंबई यांना कांही अटी व शर्ती घातल्या होत्या. परंतु कांही वेळेस महिला आर्थिक विकास महामंडळाने त्याचे काटेकोरपणे पालन न केल्यामुळे कांही बंद्यांनी कारागृहास पुरविण्यांत येणा-या अन्नधान्यांबाबत न्यायालयात अपील दाखल केले होते व त्यावर सुनावणी होऊन महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत,मुंबई ही संस्था जर योग्य दर्जाचा व वेळेवर पुरवठा करीत नसेल तर त्यांच्याकडील पुरवठा बंद करण्यांत यावा व दुस-या संस्थेस देण्यांत यावा, असे न्यायालयाने सुचविले आहे.

२. राज्यातील कारागृहांना करण्यांत येणा-या अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंच्या पुरवठ्याबाबत न्यायालयाने दिलेल्या सूचनेवर शासनाने गंभीरपणे विचार केला असून त्यानुसार देण्यांत आलेल्या अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंच्या पुरवठयाचे कामासंबधीत फेरविचार करण्यांत येत आहे.

३. राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंचा पुरवठा करण्याचे काम महिला आर्थिक विकास महामंडळास देण्यापूर्वी ते काम महाराष्ट्र स्टेट को-ऑप-कन्झुमर्स फेडरेशन लि. या शासन अंगीकृत संस्थेस देण्यांत आले होते व या संस्थेने हे पुरवठयाचे काम अनेक वर्ष नियमितपणे केलेले आहे. तथापि आता भारतीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत, मुंबई या संस्थेने शासनास दिनांक ११.९.२००० च्या निवेदनाद्वारे राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंच्या पुरवठ्याचे काम आपणास द्यावे अशी शासनास विनंती केली आहे.

..२.

या निवेदनातील विनंतीचा व एकूण परिस्थितीचा सारासार विचार करुन शासन या आदेशाद्वारे महिला आर्थिक विकास महामंडळास दिलेले अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंच्या पुरवठयाचे काम रद्द करुन हे काम भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित,मुंबई या संस्थेस देण्याबाबतचा निर्णय घेण्यांत येत आहे.

४. राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंचा पुरवठा करण्याबाबत शासनाने कांही अटी व शर्ती घातल्या असून त्यासोबत जोडलेल्या परिशिष्ट"अ" मध्ये नमूद करण्यांत आलेल्या आहेत. या अटींच्या पालनाच्या अधीन राहून शासन भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित,मुंबई या संस्थेस राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंचा पुरवठा करण्याचे काम ते जोपर्यंत समाधानकारकरित्या करीत आहेत तोपर्यंत किंवा हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून पाच वर्षाच्या (दि. २१ ऑक्टोबर २००५) कालावधीपर्यंत चालू राहील.

५. राज्यातील कारागृहांना करण्यांत येणा-याअन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तुंपैकी गहू, तांदूळ,ज्वारी,बाजरी,साखर व पामोलीन तेल या वस्तू सरकारी धान्य गोदामातून खरेदी करण्यास कारागृह अधीक्षक यांना मुभा/परवानगी देण्यांत येत आहे. या वस्तु जेवढया प्रमाणात सरकारी धान्य गोदामातून मिळतील तेवढया प्रमाणात मिळविण्यांत याव्यात व अधिक आवश्यकता भासल्यास त्या भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित,मुंबई यांचेकडून खरेदी करण्यांत याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गु.ज.कुळकर्णी )
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग**

**प्रति,**
**कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.**
**सर्व कारागृह उपमहानिरीक्षक.**
**सर्व कारागृह अधिक्षक.**
**प्राचार्य,बोर्स्टल स्कूल,कोल्हापूर/नासिक.**
**महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.**
**महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा) मुंबई.**
**महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.**
**महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.**
**अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.**
**निवासी लेखा अधिकारी, मुंबई**
**सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.**
**कृषी व सहकार विभाग (२४ सी) मंत्रालय,मुंबई.**
**वित्त विभाग , मंत्रालय,मुंबई.**
**निवडनस्ती ,गृह विभाग., पीआरएस-२.**

## परिशिष्ट-"अ"

गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-०११८/२(१०१)/पीआरएस-२ दिनांक २१ ऑक्टोबर २०००संबंधित अन्नधान्य व खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेकडून राज्यातील सर्व कारागृहांना होण्यासाठी आवश्यक असलेल्या अटी व शर्ती.

-------

१) राज्यातील सर्व कारागृहाकडून भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत, मुंबई या संस्थेकडे मागणी आल्यानंतर अन्नधान्य व खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा महाराष्ट्रातील सर्व मध्यवर्ती कारागृहे व जिल्हा कारागृह,वर्ग-१,वर्ग-२,वर्ग-३ यांना सात दिवसापर्यंत करेल. यात बोर्स्टल स्कूल,कोल्हापूर व नाशिक यांचाही समावेश असेल.

२) कारागृह अधिक्षकांनी १) जिल्हा पुरवठा अधिकारी २) तहसीलदार ३) सांख्यिकी अधिकारी ४) किराणा मर्चंट असोसिएशन व ५) कृषी उत्पन्न बाजार समिती यांचेकडून पुरवठा केलेल्या वस्तूंचे त्या,त्या, तारखेचे बाजारभाव मागवावेत. यापैकी किमान तीघांचे दर उपलब्ध करणे आवश्यक राहील व त्यापैकी कमी दराचे देयक स्वीकारण्यांत यावे. देयक अदा करण्याची मुदत आठ दिवसांची राहील.

३) कारागृह अधीक्षकांनी अशी खात्री करुन घ्यावी की भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने लागू केलेले दर हे घाऊक बाजार दराच्या बरोबर आहेत.

४) खाद्योपयोगी वस्तू,भाजीपाला,फळे,कांदे बटाटे पुरवताना भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने कटाक्षाने हे पहावे की, कारागृह अधीक्षकांनी ज्या दर्जाच्या व विशिष्ट प्रकारच्या वस्तू मागविल्या आहेत तोच दर्जा कायम राखावा व मागितलेल्या वस्तू हया वेळेवर पुरविल्या जातील हयाची दक्षता घ्यावी. कारागृह अधीक्षकांनी,बोर्स्टल स्कूलच्या प्राचार्यांनी, आपली मागणीपत्रे वेळेत नोंदवावीत. भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई यांना सदरचे व्यवहारात १०% (अॅर्नेस्ट मनी ठरविण्यापासून) अनामत रक्कम भरण्यापासून सूट देण्यात येत आहे.

५)संस्थेने सदरचा माल हा वेळेवर व दर्जानुसार कारागृहांपर्यंत पाठविला जाईल यासाठी हमीपत्र लिहून द्यावे. जर भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने सदरचा पुरवठा वेळेवर केला नाही तर, यासंबंधी कारागृहांना येणारा अतिरिक्त खर्च तसेच सदर वस्तू पुरविण्याच्या अभावी कारागृह अधीक्षकांनी स्थानिकरित्या खरेदी करुन केलेला खर्च हा भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेकडून वसूल करण्यांत येईल.

६) अन्नधान्याचा व इतर अनुषंगिक वस्तूंचा पुरवठा हा भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत, मुंबई या संस्थेने कारागृहांच्या प्रवेशद्वाराजवळ किंवा आवारात करावा. वरील बाबतीत काही विवाद उत्पन्न झाल्यास तसेच सदर योजनेची अंमलबजावणी करताना कांही वितुष्ट आल्यास याबाबत शासनाने घेतलेला निर्णय अंतिम व बंधनकारक राहील.

७) कारागृहाकडून भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई यांना बिले प्रदान झाल्यानंतर त्यांना दराबाबत काही शंका आल्यास, त्यांनी एक महिन्याच्या आत कारागृह अधीक्षकांशी संपर्क साधून शंकेचे निरसन करुन घ्यावे. त्यानंतर त्यांची कुठलीही तक्रार स्वीकारली जाणार नाही.

८)भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने कारागृहाच्या मागणीनुसार योग्य दर्जाच्या पण मानवी आहारास योग्य व भेसळविरहित खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करावा.

९) कारागृहाचे अधीक्षक खाद्योपयोगी वस्तूंची मागणी पुरवठ्यास योग्य मुदत देतील त्या त्या वेळी खाद्यो[illegible]गी वस्तूंचा पुरवठा भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने नेमून दि[illegible]ल्या मुदतीत करावा.

१०) भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने पुरविलेल्या खाद्योपयोगी वस्तूंपैकी कोणतीही हलक्या दर्जाची किंवा भेसळयुक्त आहे, असे कारागृह वैद्यकीय अधिका-यांचे मत झाल्यास, अशा नाकारलेल्या अथवा अयोग्य ठरविलेल्या वस्तू कारागृहाची कोणतीही गैरसोय न करता भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेने बदलून दिली पाहिजे व त्यांचे नुकसान झाल्यास कारागृह अधीक्षक जबाबदार राहणार नाहीत.

११) तोलणे,भरणे,मार्केट टॅक्स इ.खर्च स्थानिक व्यापारी महासंघ/कृषी उत्पन्न बाजार समिती यांचेकडून निश्चित करुन घ्यावेत व कारागृह अधीक्षकांनी त्याप्रमाणे बिले अदा करावीत.

१२) गहू,ज्वारी,बाजरी,तांदूळ,साखर व कडधान्ये यांच्या पोत्याची बारदाने कारागृह अधीक्षकांनी भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेस रिकामी झाल्यानंतर परत करावीत. त्याकरीता किंमत व पॅकिंग आकार संस्थेने आकारु नये. जर तो आकारला असेल तर, कारागृह अधीक्षकांनी अदा करु नये.

१३) शेंगदाणा तेल अथवा पामोलीन तेल,खोबरेल तेल व वनस्पती तूप इत्यादी वस्तू या १५ किलोच्या पॅकिंगमधून पुरवठा करण्यांत याव्यात. या वस्तूंच्या किंमतीमध्ये डब्याच्या किंमती समाविष्ट असल्यामुळे सदर रिकामे डबे भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेस परत करण्यांत येऊ नयेत.

१४) वरील सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत स्थानिक भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादीत,मुंबई या संस्थेच्या प्रतिनिधीने कारागृह अधीक्षकांबरोबर मुद्रांकित कागदावर (स्टॅम्प पेपर) करारनामा करुन देणे आवश्यक आहे.

१५) खाद्योपयोगी वस्तांचा पुरवठा करणा-या संस्थेकडून अधीक्षकांनी मागणी केल्याप्रमाणे अन्नधान्य व इतर वस्तूचा पुरवठा ७ (सात) दिवसाचे आत कारागृहाच्या मुख्य प्रवेशद्वारापर्यंत करणे आवश्यक आहे. भाजीपाल्यासारख्या नाशवंत वस्तू त्याच दिवशी कारागृहाच्या मागणीनुसार पुरवठा करणे बंधनकारक राहील.

१६) संबंधीत संस्थेकडून पुरवठा करण्याचे वस्तूंचे सॅम्पल(नमुने) प्रथम मागवून घ्यावेत व त्या नमुन्याप्रमाणेच वस्तूंचा पुरवठा करणे बंधनकारक राहील. दिलेल्या नमुन्याप्रमाणे मालाचा पुरवठा वेळेवर होत नसल्यास पूर्वसूचना (नोटीस) न देता पुरवठा काढून घेण्याचा अधिकार शासनास राहील.

१७) गहू,तांदूळ,ज्वारी,बाजरी,साखर,पाम तेल व उपलब्ध कडधान्य व डाळी यांची खरेदी शासकीय धान्य गोदामतून करण्यांत यावी व उपरोक्त माल उपलब्ध नसल्यास ज्या संस्थेस खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठ्याचा मक्ता दिला असेल त्या संस्थेकडून खरेदी करण्याचे अधिकार अधिक्षकांना रहातील. खाद्योपयोगी वस्तू पुरवठयाचे काम एकाच संस्थेकडे राहील.

१८) अधिसूचना जाहीर करुन अटी मान्य करणा-या संस्थेकडून तसा करार करुन घ्यावा व नंतरच अशा संस्थेस मालाचा पुरवठा कारागृहाच्या प्रवेशद्वारापर्यंत करण्याबाबत सूचना देण्यांत याव्या. त्यानुसार वस्तूंच्या पुरवठयाची बिले प्रचलीत पध्दतीने व दराने कारागृहास अदा करावीत.

१९) महाराष्ट्र राज्य ग्राहक सहकारी संस्था मर्यादित,मुंबई या संस्थेस पूर्वी पुरवठयाचे काम देण्यांत आले होते. परंतु वस्तूंच्या दरामध्ये वाढ करणे काही कारागृहांना पुरवठा न करणे तसेच पुरवठा अनियमित करणे या कारणामुळे त्यांच्याकडील पुरवठ्याचे काम रद्द करुन ते महिला आर्थिक विकास महामंडळास दिले होते. त्या प्रकारची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून दक्षता घेण्याबाबत कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचेकडून भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित,मुंबई या संस्थेस सूचना देण्यांत यावी.